इथेनॉल विषयक इथेनॉल निर्मिती व त्याची अंमलबजावणी याचे धोरण ठरविण्यासाठी समिती गठीत करणेबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ससाका-२०२१/प्र.क्र.१०९/३-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १३ ऑक्टोबर, २०२१.

**प्रस्तावना:**

मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि. ७.१०.२०२१ रोजी नाबार्डचे अध्यक्ष व नाबार्ड मुख्यालयातील अधिका-यांशी विविध विषयांवर चर्चा आयोजित करण्यात आली होती. सदर चर्चेदरम्यान राज्यात इथेनॉल चे धोरण ठरविण्याबाबत तसेच साखर कारखान्यांकडून १०० टक्के इथेनॉलचे उत्पादन करण्याबाबतचा मुद्दा अध्यक्ष, नाबार्ड यांनी उपस्थित केला. त्या अनुषंगाने सहकार विभागाकडून इथेनॉल विषयक इथेनॉल निर्मिती व त्याची अंमलबजावणी धोरण ठरविण्यात यावे असे मा. मुख्य सचिव यांनी मा. मुख्यमंत्री महादेयांच्या सूचनेनुसार निर्देशित केले. सबब, इथेनॉल विषयक इथेनॉल निर्मिती व त्याची अंमलबजावणी याचे धोरण ठरविण्यासाठी आयुक्त साखर, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे अध्यक्षतेखाली एक समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

राज्यात इथेनॉलविषयक इथेनॉल निर्मिती व त्याची अंमलबजावणी याचे धोरण ठरविण्याबाबत समिती गठित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. या समितीची रचना खालीलप्रमाणे राहील :-

| | | |
|---|---|---|
| १) | आयुक्त साखर, महाराष्ट्र राज्य, पुणे | - अध्यक्ष |
| २) | श्री. संजय खताळ, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, सहकारी साखर कारखाना संघ, लि. मुंबई. | - सदस्य |
| ३) | श्री. बी.बी.ठोंबरे, अध्यक्ष, वेस्टइंडियन शुगर मिल असोसिएशन (WISMA) पुणे | - सदस्य |
| ४) | प्रा. डॉ. एस.व्ही.पाटील, तांत्रिक सल्लागार व विभाग प्रमुख (मद्यार्क तंत्रज्ञान व जैव इंधन विभाग) वसंतदादा शुगर इन्स्टिटयूट, मांजरी, पुणे | - सदस्य |
| ५) | डॉ. संजय भोसले, सहसंचालक (उपपदार्थ), साखर आयुक्त कार्यालय, पुणे | - सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा**

- केंद्रशासन आणि ऑईल मार्केटिंग यांचे इथेनॉल निर्मिती व पुरवठा याबाबतचे उदिष्टे पूर्ण होण्याच्या दृष्टीने साखर कारखाने व आसवणी प्रकल्प यांना मार्गदर्शन आणि प्रोत्साहन देण्यासाठी धोरण ठरविणे.

- केंद्र शासनाप्रमाणे राज्य शासनाचे इथेनॉल निर्मिती आणि पुरवठयाबाबत धोरण ठरविणे.
- महाराष्ट्र राज्यातील साखर कारखाने आणि आसवणी प्रकल्प यांची क्षमता वाढ करुन पेट्रोलमध्ये मिश्रणासाठी आवश्यक आराखडा तयार करणे.

२. समितीने दोन महिन्यात शासनास अहवाल सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१३११५३१६३७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Ramesh Pimpale

Digitally signed by Prashant Ramesh Pimpale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fa29ab2a9a96d3a62a7a97531711f1ef9f3e78de039be6cabb44929032069507, serialNumber=c9fc0e76e90819f7f6d29d043a3e393d7982322683a082d04eda26b7264e4837, cn=Prashant Ramesh Pimpale
Date: 2021.10.13 13:25:10 +05'30'

**(प्रशांत र. पिंपळे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा. मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) प्रधान सचिव (सहकार व पणन), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) डॉ. संजय भोसले, सहसंचालक (उपपदार्थ),साखर आयुक्त कार्यालय, पुणे
८) श्री. संजय खताळ, व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, सहकारी साखर कारखाना संघ, लि. मुंबई.
९) श्री. बी.बी.ठोंबरे, अध्यक्ष, वेस्ट इंडियन शुगर मिल असोसिएशन (WISMA) पुणे.
१०) श्री .एस.व्ही.पाटील, वसंतदादा शुगर इन्स्टिटयुट, मांजरी, पुणे .
११) कार्यासन २२-स/२५-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती (३-स).